अर्थसंकल्पीय अनुदान २०१९-२०२० मागणीक्र. वाय-०४, लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (योजेनेत्तर) (२७०२ ३९१८)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी १६१९/प्र.क्र.७०/पापु-१५
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्नालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग,नवीन मंत्रालय इमारत,मुंबई-४०० ००१
तारीख: २६ नोव्हेंबर, २०१९

**वाचा:-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्तसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१.०४.२०१९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बीयुडी १६१९/प्र.क्र.७०/पापु १५ दि.२६.०४.२०१९
३) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांकः अर्तसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९

**प्रस्तावना:-**

सन २०१९-२०२० चा अंतरिम अर्थसंकल्प सादर करून विनियोजन विधेयक मंजुर होईपर्यंतच्या कालावधीसाठीचा(माहे एप्रिल, २०१९ ते जुलै, २०१९ या चार महिन्यांचा) खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने ”महाराष्ट्र विनियोजन(लेखानुदान) विधेयक, २०१९” मंजुर केले होते. सदर चार महिन्यांसाठी विभागांना दर्शविलेल्या रकमांचे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर(बीम्स) वितरण करण्याबाबत संदर्भाधिन क्रमांक १ अन्वये सुचित करण्यात आले होते. त्यानुषंगाने लेखाशीर्ष २७०२-लहान पाटबंधारे(२७०२ ३९१८) खाली वित्तीय वर्ष २०१९-२०२० करीता मंजुर अनुदानापैकी लेखानुदान अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर संदर्भाधिन क्रमांक २ अन्वये वितरित करण्यात आले होते.

**०२.** “महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१९” यास विधानमंडळाने मंजुरी दिलेली असुन महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि तो महाराष्ट्र अधिनियम क्रंमाक ०८ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-०४ दि. ०४.०७.२०१९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. वित्तीय वर्ष २०१९-२०२० च्या अर्थसंकल्पिय तरतुदीची मासिक विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर(बिम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०१९-२०२० च्या प्रथम नऊमाहीकरीता(डिसेंबर २०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीय निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ६० टक्केच्या मर्यादित अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण(बीम्स) प्रणालीवर वितरण करण्याबाबत संदर्भ क्रमांक ३ अन्वये सुचित करण्यात आले आहे.

**०३.** सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा खर्च भागविण्यासाठी “२७०२ लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना(योजनेत्तर)(२७०२ ३९१८)” या लेखाशीर्षाखाली रु. ४६,७८,२८,०००/- इतकी तरतुद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ नुसार सदर लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेले अनुदान संचालक, भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधिन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण आणी विकास यंत्रणेची आस्थापना व इतर अनुषंगिक बाबीवरील खर्च भागविण्यासाठी पुढील विवरणपत्रात स्तंभ-६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रू.१२४७५५५००/- अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाद्वारे मुक्त करण्यात येत आहे.

(रूपये हजारात).

| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | वित्तीय वर्ष २०१९-२०२० मंजुर तरतुद | सन २०१९-२० च्या प्रथम ९ महिन्यांकरीता ६०% प्राप्त अनुदान | वितरित केलेले लेखानुदान एप्रिल, २०१९ ते जूलै, २०१९ | वितरित करावयाचे अनुदान ऑगस्ट, २०१९ ते डिसेंबर, २०१९ |
|---|---|---|---|---|---|
| १ | ०१-वेतन | ४४६५३८ | २६७९२२.८०० | १४८८४६ | ११९०७६.८ |
| २ | ०३-अतिकालिक भत्ता | ६२४ | ३७४.४०० | २०८ | १६६.४ |
| ३ | ०६-विद्युत टेलिफोन पाणी पट्टी | ३१०० | १८६०.००० | १०३३ | ८२७ |
| ४ | ११- प्रवास खर्च | ७०८७ | ४२५२.२०० | २३६२ | १८९०.२ |
| ५ | १३-कार्यालयीन खर्च | ४१९७ | २५१८.२०० | १३९९ | १११९.२ |
| ६ | १४-भाडेपट्टी व कर | ४४८३ | २६८९.८०० | १४९४ | ११९५.८ |
| ७ | १७-संगणक खर्च | १६२ | ९७.२०० | ५४ | ४३.२ |
| ८ | २०-इतर प्रशासकीय खर्च | १ | ०.६०० | ०.३०० | ०.३०० |
| ९ | २४-पेट्रोल तेल वंगण | ५४६ | ३२७.६०० | १८२ | १४५.६ |
| १० | ५१-मोटार वाहने | १०९० | ६५४ | ३६३ | २९१ |
|  | एकूण | ४६७८२८ | २८०६९६.८०० | १५५९४१.३ | १२४७५५.५ |

०२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्या अधिनस्त कार्यालयांना उक्त लेखाशीर्षाखाली अनुदान वितरित करतेवेळी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तिय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे तसेच संदर्भिय शासन परिपत्रकातील परिच्छेद क्रमांक ४ ते १९ व सोबतच्या परिशिष्ठातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

०३. सदर खर्च मागणी क्र.वाय-४, लेखाशीर्ष “२७०२-लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना(योजनेत्तर) २७०२ ३९१८” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा. तसेच संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेले अनुदान मासिक तरतुदीतून (Monthly Cash Flow) भागविण्यात यावा. सदर निधी वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ शासन परिपत्रकातील तरतूदींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२६११२३२३४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2019.11.26 17:23:28 +05'30'

**( चेतन निकम )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
२. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व.
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२-नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
५. वित्त विभाग, अर्थसंकल्प १६(२ प्रती)
६. कक्ष अधिकारी/लेखा अधिकारी, पापु-०४, पापु-२०
७. निवड नस्ती पापु-१५